विशेष केंद्रीय सहाय्य सन २०१४-१५
मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विकेंस-२०१५/प्र.क्र.६४/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: ११/०९/२०१५

**वाचा-**

१) आदिवासी विकास विभागाचे पत्र क्र.केंद्रीय २०१४ /प्र.क्र.६२/का-१९ दि.०६/०८/२०१४
२) जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०३/(१३)/२०१४-SG-II,दि.०९/०२/२०१५
३) आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांचे पत्र क्र.विकेंस-२०१४/प्र.क्र.३६/का.८(५), दि.१६/०२/२०१५

**प्रस्तावना -**

राज्य शासनाच्या दि. ०६/०८/२०१४ च्या प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाने त्यांच्या विशेष केंद्रीय सहाय्य (SCA to TSP) या योजनेखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पुढील योजनांकरीता एकुण ११७२६.१८ लक्ष निधी वितरीत केला आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | मंजूर निधी (रु. लाखात) |
|---|---|---|
| १. | ग्रामिण हस्तकला विकास प्रकल्प (Bamboo wood metal & Terracotta Handicraft project be CCF Gadchiroli) | १९४.०० |
| २. | शेतकरी उत्पादक संघटना (Farmer Producer Organization) स्थापन करणे | ४००.०० |
| ३. | प्रज्ञावंत आदिवासी विद्यार्थ्यांच्या प्रतिभेला उत्तेजन देणे (Tapping & Nurturing talented Adivasi children by moving Academy of Medicine and Biomedicine) | १५६.०० |
| ४. | आदिवासी उपयोजना क्षेत्रातील अनुसूचित जमातीच्या दारिद्र्य रेषेखालील शेतकऱ्यांच्या आर्थिक उन्नतीसाठी मोगरा लागवडीसाठी अर्थसहाय्य देणे. (Mogara Cultivation) | २८४.९७ |
| ५. | पर्यावरण संपुरक खेडी विकास कार्यक्रम (Climate Smart Village Programme) | ५००.०० |
| ६. | गडचिरोली अगरबत्ती उत्पादन प्रकल्पासाठी पक्के शेडचे बांधकाम करणे. (Construction of Agarbatti Manufacturing sheds) | १५४.०० |
| ७. | महिला बचतगटांना शेळीगटाचा पुरवठा करणे (१० शेळ्या+ १ बोकड) (Supply of Goat units to Women SHGs- १० Female+ १ Male) | ५००.०० |
| ८. | अनूसुचित जमातीच्या गटांना लाहुरी पालन (फार्म) करणेकरीता अर्थसहाय्य करणे. | २४.०० |
| ९. | आदिवासी विभागातील १२ जलाशयांवर पिंजरा पध्दतीने मत्स्यपालन प्रकल्प व गडचिरोली जिल्ह्यांतील १६ जलाशयांमध्ये मत्स्यबिज संचयन करणे | १०००.०० |

| | | |
|---|---|---|
| १०. | अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांच्या शेतात शेततळ्याचे खोदकाम प्लास्टीक अस्तरीकरणासह करणे. | १०००.०० |
| ११. | पडकई विकास योजना (Terracing) | १९००.०० |
| १२. | सन २०१४-१५ या वर्षात विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत मंजूर झालेल्या अनुदानातून मुला-मुलींच्या वसतिगृह इमारतीचे बांधकाम करणे. | १६००.०० |
| १३. | १. एकछत्री शैक्षणिक योजना (Education Umbrella Scheme) अंतर्गत प्रज्ञाशोध, गुणवत्ता मोहीम, शैक्षणिक समूपदेशण व आश्रमशाळा सलग व्यवसाय प्रशिक्षण उपक्रम राबविणे.<br>२. For Innovative items proposed under Umbrella Scheme | २००.०० |
| १४ | Tube well + Pump set | ७४५.०० |
| १५. | Biodiversity | १००.०० |
| १६. | CFR Planning | ३००.०० |
| १७. | Eco-Tourism | ७३८.२७ |
| १८. | Introduction of pulses technology in Rice fallow to improve livelihood & nutritional security of Tribal people of Vidharbha region by ICARDA | ५००.०० |
| १९. | Kitchen garden for Ashram School | १०००.०० |
| २०. | Monitoring and Evolution | २२९.९४ |
| २१. | Pilot project for promotion of sports | १०००.०० |
| २२. | Conducting status survey of sickle cell anaemia and issuance of cards to १००% tribal Students in schools & hostels | १००.०० |
| | एकुण | ११७२६.१८ |

वितरीत निधीतून आदिवासी विभागातील १२ जलाशयांवर पिंजरा पध्दतीने मत्स्यपालन प्रकल्प व गडचिरोली जिल्ह्यांतील १६ जलाशयांमध्ये मत्स्यबिज संचयन करणे या योजनांच्या मार्गदर्शक सूचनांना मंजूरी देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार खालील योजनांच्या/कामांच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचनाना मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | मंजूर निधी (रु. लाखात) | मंजूर मार्गदर्शक सुचना (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १. | CFR Planning | ३००.०० | २०९.९५ |
| | एकुण | ३००.०० | २०९.९५ |

सदर मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही करण्यात यावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी. तसेच ज्याप्रकरणी प्रशासकीय मान्यता घेण्यांची आवश्यकता असेल ती प्रकरणे स्वतंत्रपणे शासन मान्यतेसाठी सादर करावीत.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१५१६३३१५९५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Gorakh Mahale

Digitally signed by Manojkumar Gorakh Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46649f0512aae1ea70b45531f8da4721c9c533d2067535914c930bf1b55d3262, cn=Manojkumar Gorakh Mahale
Date: 2015.09.15 16:38:09 +05'30'

**मनोजकुमार महाले**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

२. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
३. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
५. महसूल व वन विभाग / नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
६. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक
७. उपसचिव, आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
८. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
९. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

## परिशिष्ट
## विशेष केंद्रीय सहाय्य २०१४-१५ अंतर्गत प्रस्तावित योजना

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव | सामुहिक वनहक्काचे नियोजन (CFR Planning) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ नियम २००८, व सुधारणा नियम २०१२ अंमलबजावणी. |
| २ | योजेनेतील युनिट संख्या | **१.** ग्रामसभा वनहक्क समिती- १५००२<br>**२.** उपविभागीय स्तरीय वनहक्क समिती- ९४<br>**३.** जिल्हास्तरीय वनहक्क समिती- २८ |
| **३** | **योजनेसाठी येणाऱ्या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक** | **३००. ०० लक्ष** **रु. लक्ष** |

| अ.क्र. | खर्चाचा तपशिल | अंदाजीत खर्चाची रक्कम |
|---|---|---|
| १ | सामुहिक वनहक्क प्रकल्प राबविणे (CFR Planning)व वनहक्क कायदा अंमलबजावणीसाठी आयुक्तालय नाशिक येथे आणि अपर आयुक्त कार्यालय, नाशिक, ठाणे, अमरावती, नागपुर येथे Consultant नेमणुक करणे .<br>प्रस्तावित एकुण पदे व मानधन -<br>१. Consultant - १ पद<br>(आयुक्त कार्यालय)<br>प्रती महा मानधन रुपये ४५,०००/- + ३०००/- conveyance allowance +२०००/- Phone charges = एकुण रु ५००००/- तसेच प्रवास खर्च व भत्ता, शासनाच्या प्रचलित नियमानुसार लागु राहील.<br>मानधन रुपये ५०,००० x १२ = ६,००,००० रुपये<br>२. Consultant - ४ पद<br>(अपर आयुक्त कार्यालय)<br>प्रती महा मानधन रुपये ३८०००/- + २५००/- conveyance allowance +१५००/- Phone charges = एकुण रु ४२०००/- तसेच प्रवास खर्च व भत्ता, शासनाच्या प्रचलित खर्चानुसार लागु राहील.<br>मानधन रुपये ४२००० x ४ x १२ = २०,१६,०००/- | २६,१६,००० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | २ | कर्मचाऱ्यांचे मानधन<br>वनहक्क कायदा अंमलबजावणी अधिकारी / कर्मचारी यांचे मानधनावरील खर्च -<br>अ)आदिवासी विकास आयुक्तालय स्तर -<br>मुख्य समन्वयक -१ प्र.म.रू.२९५००<br>२९५००X१२=३,५४,०००/-<br>समन्वयक -१ प्र.म.रू.१९५००<br>१९५०० X१ X १२=२,३४,०००/-<br>सहाय्यक -२ प्र.म.रू.१०४००<br>१०४०० X२ X १२=२,४९,६००/-<br>ब)जिल्हास्तरीय व उपविभागीय स्तरीय समिती-<br>समन्वयक - २ प्र.म.रू.१९६००<br>१९६०० X२ X १२=४,७०,४००/-<br>समन्वयक -१२ प्र.म.रू.१५६००<br>१५६०० X१२ X १२=२२,४६,४००/-<br>सहाय्यक -४० प्र.म.रू.१०४००<br>१०४०० X४० X १२=४९,९२,०००/-<br>शिपाई - १ प्र.म.रू.७५००<br>७५०० X१ X १२=९०,०००/- | ८६,३६,४०० | |
| | | ३ | सामुहीक वनहक्क दावे दाखल करण्याची प्रक्रीया पुर्ण करणे, कार्यशाळा, शिबीरे, बैठक आयोजित करणे व त्यावर येणारा आनुषंगिक खर्च जसे चहा, नास्ता, वर्किंग लंच, निवास व्यवस्था, बॅनर्स, सभागृह, माहिती पुस्तिका २६ जिल्ह्यांसाठी एकुण २९ एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पनिहाय कार्यशाळा<br>२९ X ११०००० = ३१,९०,००० | ३१,९०,००० | |
| | | ४ | मान्यदाव्यांचे Data base तयार करणे, दावे अपलोडींग, नोंदणी व पुर्नपडताळणी करण्यासाठी खर्च, स्टेशनरी, प्रिंटींग खर्च व कार्यालयीन खर्च- २६ जिल्ह्यांसाठी प्रत्येकी- ११४६५३ लक्ष.<br>२६X११४६५३=२,९८,०९,८०० एकुण प्राप्त वैयक्तिक दावे- ३,४६,०१७ व सामुहिक वनहक्क दावे ७,११२ असे एकुण ३५३१२९ पैकी १,४६,७६६ मान्य झालेल्या दाव्यांचे डेटाबेस संगणकावर | २९,८०,९८० | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | तयार करावयाचे आहे. त्यासाठी सदर खर्च अपेक्षित आहे. | |
| | | ५ | वाहन भाडे व प्रवास खर्च-<br>वनहक्क कायदा कंन्सलटन्ट यांना प्रतीदौरा वाहन भाडे रु.३५००/- याप्रमाणे एका महीन्यात ४ दौऱ्यांसाठी रु.१४०००/- वाहन भाडे खर्च येणार आहे. अपर आयुक्त येथील ४ कन्सलटंट यांना १२ महिन्यांत एकुण ४८ दौरे करणे अपेक्षित आहे. यासाठी रु. ८,४०,५००/- वाहन भाडे खर्च येणार आहे. कंन्सलटन्ट व वनहक्क अंमलबजावणी कामकाज करणारे मानधनावरील अधिकारी / कर्मचारी यांचेसाठी प्रवास खर्च रु.१,६०,०००/- अपेक्षित असून असे एकुण रु.१०००००/- खर्च होणार आहे. | १०,००,००० |
| | | ६ | संगणक खरेदी व देखभाल दुरुस्ती खर्च प्रस्तावित ५ कंन्सलटन्ट यांचेसाठी ५ संगणक संच<br>आयुक्तालय, नाशिक येथील वनहक्क कायदा कक्षासाठी २ संगणक संच रु. ५०,०००/- याप्रमाणे ७ संगणक संच रु. ३,५०,०००/- व दुरुस्ती खर्च रु. ५०,०००/- आयुक्तालय स्तरावरील स्टेशनरी व इतर कार्यालयीन खर्च २,१०,०००/- | ६,१०,००० |
| | | ७ | TRTI-VGIS-Software देखभाल खर्च व Software programmer मानधन रु. ५,४०,०००/- एकुण खर्च | ५,४०,००० |
| | | ८ | अनुसुचित जमाती व इतर पारंपारीक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ नियम २००८, व सुधारणा नियम २०१२ अंमलबजावणी कायद्याचा लाभार्थ्यांवर झालेल्या परिणामाचे अभ्यास व संशोधन खर्च १,७०,०००/- संस्था आदिवासी संशोधन आणि प्रशिक्षण संस्था पुणे | १,७०,००० |
| | | ९ | आदिवासी विकास स्तरावरील आढावा बैठक-बैठकीसाठी उपस्थित राहणाऱ्या कर्मचाऱ्यासाठी नास्ता, भोजन व प्रवास खर्च | २,५३,९२० |
| | | १० | वाहन खरेदी (Tata Make)<br>Tata Safari Strome Ex ४x१ | ७,५०,००० |

| | | |
|---|---|---|
| | | ११ Xerox मशिन- प्रिंटर, स्कॅनर मशिन खरेदी करणे — २,५०,०००<br>एकुण — २,०९,९५,००० |
| ४ | अंमलबजावणी अधिकारी | **१.** उपविभागीय अधिकारी तथा अध्यक्ष उपविभागीय वनहक्क समिती<br>**२.जिल्हाधिकारी** तथा अध्यक्ष जिल्हास्तरीय वनहक्क समिती. |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | महसूल विभाग, वनविभाग, भूमी अभिलेख, जमाबंदी विभाग, कृषी विभाग, ग्रामविकास विभाग, अपर आयुक्त, आदिवासी विकास, प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, NGO |
| ६ | नियंत्रक अधिकारी | आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक |
| ७ | | अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८, व सुधारणा नियम २०१२ नुसार अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी यांना कलम ३ (१) नुसार वैयक्तीक व सामुहिक वनहक्क किंवा दौहोंचे धारणाधिकार मिळण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहे. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पांरपारिक वन निवास यांना स्वत:च्या उपजिविकेकरीता वनजमिनी धारण करण्याचा, त्यामध्ये राहण्याचा हक्क, निस्तार सारखे हक्क, गावाच्या सिंमांतर्गत किंवा सिमेबाहेर पांरपारिक रित्या गोळा केले जाणारे गैाण वनोत्पादन गौळा करणे, त्याचा वापर करणे, पारंपारिक मौसमी साधन संपत्ती मिळण्यास हक्क असणे, निरंतर वापर करण्यासाठी पारंपारिकरीत्या संरक्षण व सवंर्धन करण्यात आलेल्या कोणत्याही सामाजिक वन स्रोताचे संरक्षण, पुनर्निर्माण, संवर्धन, विनियमन व व्यवस्थापन करण्याचे हक्क आहेत. |
| ८ | योजना राबविण्याची कार्यपध्दती | १. राज्यात अधिनियमाची अंमलबजावणी १ जानेवारी २००८ पासून सूरु झाली<br>२. वनहक्क कायदा अंमलबजावणी साठी राज्यात १५००२ ग्रामसभा १२० उपविभागीय स्तरीय समिती, २८ जिल्हास्तरीय वनहक्क समिती गठीत केल्या आहेत. वनहक्काचे दावे निर्धारीत करण्यासाठी वनहक्क दावेदारांची सुनावणी घेऊन तशी यादी तयार करुन नोंद वहीत नोंदी करुन घेऊन, ग्रामसभेने सुनावणी घेऊन तशी ग्रामसभा वनहक्कांच्या मागण्यांचा प्रस्ताव शिफारशी सह उपविभागीयस्तरीय समिती कडे सादर केले जातात.<br>उपविभागीयस्तरीय वनहक्क समिती ग्रामसभांची सर्व निर्णयांची पडताळणी करुन ग्रामसभेने सादर केलेले नकाशे व तपशील एकत्र करुन दाव्यांची खरे पणाची खात्री करुन घेण्यासाठी तपासणी केली जाते व प्रस्ताव शिफारशी सह जिल्हास्तरीय वनहक्क समितीकडे सादर केले जातात.<br>उपविभागस्तरीय वनहक्क समितीने सादर केलेल्या वनहक्कांच्या मागण्या व अभिलेख विचारात घेऊन त्यास अंतिम मान्यता देण्यात येते. |

| | | |
|---|---|---|
| | | उपविभागीय समितीच्या आदेशने व्यथीत झालेल्या वनहक्क धारकांकडून आलेल्या विनंती अर्जाची सुनावणी करुन वनहक्काचे दाव्यांवर निर्णय घेण्यात येतो. ग्रामसभेचा निर्णय अथवा शिफारस अपुर्ण असल्याचे, अन्यथा प्रथमदर्शनी जास्तीची तपासणी करणे आवश्यक आहे. असे आढळल्यास उपविभागीय स्तरीय समिती अथवा जिल्हास्तरीय समिती अशा दाव्यांत फेरबदल करण्याऐवजी किंवा तो फेटाळण्याऐवजी दावा ग्रामस्तरावरील वनहक्क समितीकडे ( ग्रामसभेकडे) पुर्नविचारार्थ पाठविला जातो. |
| ९ | योजनेच्या अटी व शर्ती | **१.** १३ डिसेंबर २००५ पुर्वी आदिवासी वनहक्क धारकांची वा जमीनीवरील वैध हक्क दारी असावी<br>**२.** ३१ डिसेंबर २००७ रोजी ती वा जमिन कसत असली पाहिजे.<br>**३.** इतर पारंपारिक वननिवासी हे दि. १३/१२/२००५ पुर्वी कमीत कमी तीन पिढ्यानपासुन वनात राहणारे व उपजीवीकेच्या गरजा भागविणारे वनावर अवलंबुन असणे.<br>**४.** वनहक्कांना मान्यता देण्यासाठी व ते निहीत करण्यासाठी पुरावा सादर करणे आवश्यक आहे. |
| १० | योजनेचे सनियत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे अध्यक्षतेखाली राज्य संनियत्रण समितीचे त्रैमासिक बैठकीत अंमलबजावणी बाबत आढावा घेण्यात येईल. आयुक्त, आदिवासी विकास वेळोवेळी आढावा घेतील. |

## विशेष केंद्रीय सहाय्य २०१४-१५ अंतर्गत प्रस्तावित योजनेचा व खर्चाचा तपशिल

| **अ. क्र.** | **खर्चाचा तपशिल** | **अंदाजीत खर्चाची रक्कम रुपये** | **त्याबाबतची कार्यवाही** |
|---|---|---|---|
| १ | **सामुहिक वनहक्क प्रकल्प राबविणे** (CFR Planning) व वनहक्क कायदा अंमलबजावणीसाठी आयुक्तालय नाशिक येथे आणि अपर आयुक्त कार्यालय , नाशिक, ठाणे, नागपुर, अमरावती येथे एकुण ५ Consultant यांची नेमणुक करणे. व मानधन अदा करणे. | २६,१६,००० लक्ष | अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८, व सुधारणा नियम २०१२ नुसार प्रभावी पणे अंमलबजावणी करण्यासाठी आयुक्तालय नाशिक येथे आणि अपर आयुक्त आदिवासी विकास विभाग, नाशिक, ठाणे, अमरावती, नागपुर. येथे प्रत्येकी एक असे एकुण पाच Consultant ची आवश्यक आहे.<br>यांचेकडुन खालील प्रमाणे कामे करून घेण्यात येतील.<br>**१.** FRAच्या कार्यवाहीसाठी Field मधे जाऊन Problem समजुन घेणे व उचित कार्यवाही Suggest करणे.<br>**२.** FRA expedite होईल यासाठी उपाययोजना सुचवणे. व अंमलबजावणी करून घेणे. |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | **३.** FRA अंतर्गत दिलेल्या जमीनींचा विकास होईल असे उपाय Suggest करणे.<br>**४.** या अनुषंगाने इतर कामे करणे.<br>वरील कामासाठी कंन्सलटन्स ची नेमणुक करावयाची असुन त्यांचे मानधनाचा खर्च सदर निधीमधुन करण्यात येईल यासाठी रू.२६,१६,०००/- खर्च अपेक्षत आहे.<br>हा खर्च सदरनिधीतुन भागविण्यात येईल. |
| २. | **कर्मचाऱ्यांचे मानधन**<br>वनहक्क कायदा अंमलबजावणी साठी आयुक्तालय नाशिक , जिल्हास्तरीय वनहक्क समिती व उपविभागीय स्तरीय वनहक्क समिती येथे एकुण ५९ अधिकारी / कर्मचारी मानधन तत्वारील कार्यरत आहेत. त्यांचे एका वर्षासाठी मानधन खर्च रू.८६,३६,४०० आहे. | ८६,३६,४०० **लक्ष** | राज्यात अनुसूचित जाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००८ व नियम २००८ व सुधारणा नियम २०१२ चे अंमलबजावणी मानधन तत्वावर ५९ कर्मचारी कार्यरत आहेत. त्यापैकी आयुक्ताल स्तरावर कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांचेसाठी मानधनासाठी एका वर्षाला लागणारा निधी रू.८,३७,६००/- व जिल्हास्तरीय समिती व उपविभागीय स्तरीय समिती स्तरावरील अधिकारी / कर्मचारी यांचे मानधनासाठी एका वर्षाला लागणारा निधी रू.७७९८,८००/- असा एकुण मानधनावर एका वर्षाला **रू. ८६, ३६,४००/-** खर्च येईल.<br>माहे जुन २०१५ अखेर ग्रामसभा वनहक्क समिती, उपविभाग वनहक्क समिती व जिल्हास्तरीय वनहक्क समिती पातळीवर १०७०० दावे प्रलंबित आहेत. २००६ टायटल्स वाटपाचे काम बाकी आहे, २४७६६ प्रकरणांत जमिन मोजणी होणे बाकी आहे, ४६५४४ प्रलंबित अपिल्स आहेत, तसेच ६१२७८ सातबारा वाटप होणे बाकी आहे. यासाठी मनुष्यबळाची आवश्यक्ता आहे. मानधनासाठी जिल्हाधिकारी यांना निधी उपलब्ध करून देण्यात येईल. तसेच आयुक्तालयातील वनहक्क कायदा कक्षात कार्यरत असणारे मानधनावरील अधिकारी कर्मचारी यांना मानधनाचा खर्च या निधीतुन करण्यात येईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | **सामुहिक वनहक्क दावे दाखल करण्याची प्रक्रिया पुर्ण करणे,** कार्यशाळा, शिबीरे, बैठक आयोजित करणे व त्यावर येणारा अनुषंगीक खर्च जसे चहा, नास्ता, वर्किंग लंच, निवास व्यवस्था, बॅर्नस, सभागृह, माहिती पुस्तिका) यासाठी खर्च करणे. | ३१,९०,००० लक्ष | माहे जुन २०१५ चे अहवाला नुसार सामुहिक वनहक्काची दावे ७११२ ग्रामसभेकडे दाखल झाली असून ३९२२ दावे मान्य झाली आहेत. राज्यात १५००२ ग्रामसभा आहेत. १५ जिल्ह्यातील ६८ तालुक्यात वनाचा भाग असून गौणवनउपज व मत्स्य उत्पादनाचे दावे दाखल होण्यास वाव आहे. म्हणून सामुहिक वनहक्क दावे दाखल करण्याची प्रक्रिया कालबध्द कार्यक्रम निश्चित करुन ६ महिन्यात पुर्ण करण्यात येईल. यासाठी तालुका पातळीवर २९ एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प निहाय कार्यशाळा / शिबीरे / बैठकी घेणे आवश्यक आहे. कार्यशाळे द्वारे जनजागृती करुन सामुहिक दावे दाखल करण्याची कार्यवाही करण्यात येईल. त्यासाठी रु. ३१, ९०,०००/- लक्ष खर्च येईल यात व्याख्याते, यांचे मानधन, निवास व्यवस्था व प्रवास खर्च समाविष्ठ आहे. सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. |
| ४ | **मान्य दाव्यांचे** Data base **तयार करणे,** दावे उपलोड करणे, नोंदणी व पुर्नपडताळणी करण्यासाठी खर्च, स्टेशनरी, प्रींटींग खर्च, जाहिरात खर्च व कार्यालयीन खर्च व माहिती पुस्तिका, अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारणा नियम २०१२ चे पुस्तिका छपाई खर्च | २९,८०,९८० लक्ष | राज्यात ३४६०१७ वैयक्तीक दावे व ७११२ सामुहिक वनहक्काचे दावे प्राप्त झाली आहेत. त्यामधील जिल्हास्तरीय समितीने १४९३१२ दाव्यांना मान्यता दिली आहे. मान्य झालेल्या दाव्यांचे Data base शासनाला सादर करावयाची आहे. याकरीता Data base माहिती संगणकावर करावयाचे आहे. GPS Measurement Report तयार करणे. स्टेशनरी व कार्यालयीन खर्च येणार आहे. सदरचे काम २६ जिल्ह्यात करावयाची असुन त्यासाठी रू.२९,८०,९८०/- लक्ष खर्च येणार आहे. यात प्रिंटींग खर्चाचा समावेश आहे. सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. |
| ५ | **वाहन भाडे खर्च, प्रवास भत्ता व इतर खर्च** | १०,००,००० लक्ष | वनहक्क कायदा कंन्सलटन्ट व वनहक्क कायदा अंमलबजावणी मानधनावरील अधिकारी /कर्मचारी यांना क्षेत्रात प्रवास करावा लागतो त्यासाठी वाहन भाड्याने घ्यावे लागेल त्यासाठी खर्च येईल.<br>तसेच जिल्हास्तरीय वनहक्क समिती, उपविभागीय वनहक्क समिती दाव्याची पुनर्पडताळणी , सुनावणी करण्यासाठी तालुका स्तरावर प्रवास करीत असतात. आवश्यकते नुसार वाहन भाड्याने घेतले जाते त्यावर खर्च होतो. वरील खर्च रू.१०,००,०००/- लक्ष अपेक्षीत आहे. यात कार्यशाळेत उपस्थित राहणाऱ्या कर्मचाऱ्यांचे येणे जाण्याचा प्रवास खर्चाचा समावेश आहे. तसेच |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | आदिवासी विकास आयुक्तालयातील मुख्य समन्वयक, समन्वयक यांना अंमलबजावणीच्या कामासाठी २६ जिल्हास्तरीय, १२० उपविभागीयस्तरीय वनहक्क समिती पातळीवर प्रवास करावा लागतो. त्यासाठी प्रवास खर्चचा समावेश आहे. सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. |
| ६ | **संगणक खरेदी व देखभाल खर्च** | ६,१०,००० लक्ष | सन २००८-०९ यावर्षात जिल्हास्तरीय, उपविभागीय स्तरीय वनहक्क समितींना अधिनियमाचे अंमलबजावणीसाठी संगणकाचा पुरवठा करण्यात आला. आयुक्तालय स्तरावरील स्टेशनरी व इतर कार्यालयीन खर्च समाविष्ठ करून रुपये ६,१०,०००/- लक्ष प्रस्तावित केले आहे. आयुक्तालयात वनहक्क कायदा कामकाजासाठी तीन संगणक आहेत. त्यापैकी फक्त एक संगणक चांगल्या स्थितीत आहे. हे संगणक अधिनियमाची अंमलबजावणी सुरु झाल्यापासुन आहेत. दोन संगणकाची गरज आहे. तसेच ५ वनहक्क कायदा कंन्सलटन्ट यांना ५ संगणक उपलब्ध करून द्यावयाचे आहे तो खर्च देखील यात समाविष्ठ आहे. सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. |
| ७ | **TRTI-VGIS - Software देख भाल खर्च** | ५,४०,००० लक्ष | यशदा पुणे येथे TRTI-VGIS Software चे Main Server आहे तेथील Software Programmer यांचे मानधन व देखभाल खर्चासाठी यशदा पुणे यांचेकडे निधी वितरीत करण्यात येतो. त्यासाठी रू.५,४०,०००/- लक्ष खर्च आहे. सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. |
| ८ | Study and Research on FRA beneficiaries<br>संस्था - आदिवासी संशोधन आणि प्रशिक्षण संस्था, पुणे (TRTI) | १,७०,००० लक्ष | अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वननिवासी (वनहक्काची मान्यता) अधिनियम २००६ नियम २००८, व सुधारणा नियम २०१२ अंमलबजावणी कायद्याचा लाभार्थ्यांवर झालेल्या परिणामाचे अभ्यास व संशोधन करण्यासाठी **आदिवासी संशोधन आणि प्रशिक्षण संस्था, पुणे (TRTI)** यांना सोपविण्यात येणार असुन यासाठी येणारा खर्च रू. १,७०,०००/- अपेक्षत आहे . सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. |
| ९ | **आदिवासी विकास स्तरावरील आढावा बैठक** | २,५३,९२० लक्ष | बैठकीसाठी उपस्थित राहणाऱ्या राज्यातुन येणाऱ्या कर्मचाऱ्यासाठी नाश्ता व प्रवास खर्च रू.२,५३,९२०/- इतका अपेक्षत आहे. हा खर्च सदर निधीतुन करण्यात येईल. |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | **वाहन खरेदी (Tata make )**<br>TATA Safari Storme Ex ४x१ | ७,५०,००० लक्ष | वनहक्क कायदा अंमलबजावणीचे कामकाजाकरीता स्थळ भेट देणे, योजना अंमलबजावणीचे मुल्यमापन व संनियंत्रण करण्या करीता क्षेत्रिय कार्यालयात भेटी देणे. बैठकीसाठी उपस्थित राहणे, व आदिवासी विकास विभागाचे विविध योजनांवर नियंत्रण ठेवण्यासाठी क्षेत्रीय कार्यालयास वेळोवेळी भेटी देणे यासाठी वाहनाची आवशकता आहे.<br>तसेच सामुहिक वनहक्क नियोजनासाठी वनविभाग , महसुल विभाग, ग्रामविकास विभाग, कृषी विभाग या कार्यालयांशी सामुहिक वनहक्क प्रकल्प राबविण्यासाठी वेळोवळी जावे लागणार आहे. आयुक्तालयात शासन वाहन चालु स्थितीत उपलब्ध नसल्याने व वेळेवर वरील सर्व कामे करण्यासाठी प्रवास करावा लागत असल्याने वाहन उपलब्ध करणे आवश्यक आहे. वनहक्क अंलमबजावणी साठी वाहन खरेदी करण्याचा प्रस्ताव सादर करण्यात येत आहे. सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. वाहनाची खरेदी शासनाचे मान्यतेनंतर आयुक्त, आदिवासी विकास हे अधिकृत विक्रेत्याकडुन नियमानुसार खरेदी करतील. |
| ११ | **Xerox मशिन, प्रिंटर, स्कॅनर मशिन खरेदी करणे** | २,५०,००० लक्ष | आयुक्तालयामध्ये वारंवार रेकॉर्डचे झेरॉक्स करावे लागत असल्याने झेरॉक्स मशीनची नितांत गरज आहे. तसेच प्रींटर व स्कॅनर ची सुध्दा आवश्यक्ता आहे. यासाठी रू.२,५०,००० खर्च अपेक्षत आहे. सदर निधीतुन हा खर्च करण्यात येईल. |
| | **एकुण** | **२,०९,९५,००० लक्ष** | |